**श्रीमती सु.ग.पवार, सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (गट-ब) संवर्गातील पदावरील सेवा जोडून देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासेवा-२०१४/प्र.क्र.६९/२०१४/भाषा-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
तारीख: १४ नोव्हेंबर २०१४

वाचा

१) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.विश्वस-१०११/प्र.क्र.२२/ २०११/भाषा-१, दि.१८.१.२०१२.**
२) **शालेय शिक्षण विभाग क्र. एसएटी१०१०/प्र.क्र.८४/ प्रशा २, दि.९.२.२०१२.**
३) **माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट राज्य, पूणे यांचे क्र.मपब१०-२०१२/८ब-१, दि १३.२.२०१३ चे आदेश.**
४) **शिक्षण निरीक्षक,बृहन्मुंबई उत्तर विभाग यांचे पत्र क्रजा.क्र.शिनि/उवि/आस्था/३५७, दि १४.२.२०१२.**
५) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२.१.२००७.**
६) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंनियो-१००१/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८.८.२००९.**
७) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२०१४/प्र.क्र.९५/ २०१४/भाषा-१, दि.२७.८.२०१४.**

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातील सचिव (गट-अ) पदावर श्रीमती सु.ग.पवार यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून दिनांक १८ जानेवारी, २०१२ च्या आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. त्यांनी सदर पदाचा कार्यभार दि.१५ फेब्रुवारी २०१२ रोजी स्वीकारलेला आहे. श्रीमती पवार या सदर पदावर रुजू होण्यापूर्वी महाराष्ट्र शिक्षण सेवा (गट-ब) संवर्गात शिक्षण उपनिरिक्षक, बृहन्मुंबई उत्तर विभाग या पदावर कार्यरत होत्या. श्रीमती पवार यांची पूर्वीची महाराष्ट्र शिक्षण सेवा (गट-ब) संवर्गातील नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून दि.१ सप्टेबर १९९५ पासून विहित कार्यपध्दतीने करण्यात आली असून, सदर नियुक्ती नियमित स्वरुपाची आहे. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातील या पदावर रुजू होण्यासाठी शालेय शिक्षण विभाग व माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय यांच्या आदेशानुसार शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई उत्तर विभाग यांनी संदर्भाधीन क्र.४ च्या दिनांक १४ फेब्रुवारी, २०१२ च्या आदेशान्वये कार्यमूक्त केल्यावर श्रीम. पवार या दि १५.२.२०१२ (म.पू) रोजी सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ या पदावर रुजू झाल्या आहेत. श्रीमती पवार यांची पूर्वीची सेवा व आताची सेवा यामध्ये खंड पडलेला नाही. श्रीमती पवार यांनी वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १२ जानेवारी, २००७ आणि दिनांक १८ ऑगस्ट, २००९ मधील सर्व अटींची पूर्तता केलेली असल्याने त्यांना म.ना.से (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारणर भविष्य निर्वाह निधी

योजना लागू ठरते. सबब, त्यांनी दि.१ सप्टेबर १९९५ ते दिनांक १४ फेब्रुवारी, २०१२ या कालावधीतील सेवा सध्याच्या सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ या पदाच्या सेवेस जोडून देण्यास मान्यता देण्यात येत असून त्यांच्या वेतनास संरक्षण देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११५११३११५०४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhaku Raghunath Chindarkar

Digitally signed by Dhaku Raghunath Chindarkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dhaku Raghunath Chindarkar
Date: 2014.11.15 11:40:34 +05'30'

**धा.र.चिंदरकर**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

श्रीमती सु.ग.पवार, सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.

प्रत,

१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
३. सह/उप सचिव, वित्त विभाग, सेवा-४, मंत्रालय, मुंबई.
४. सह/उप सचिव, शालेय शिक्षण विभाग, प्रशा-२, मंत्रालय, मुंबई.
५. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
६. शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई उत्तर विभाग, चेंबुर, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. निवड नस्ती.